भंडारा जिल्हा कारागृह येथे कर्मचा-यांकरीता टाईप-१ ची आठ निवासस्थाने बांधण्यासाठी येणा-या खर्चाच्या अंदाजपत्रक व नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक : बीएलडी २००५/प्र.क्र.२३/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक :१६ मार्च, २००५.

वाचा:- कारागृह महानिरीक्षणालयाचे पत्र क्र.बीएलडी/भंडारा/जि.का./शा.नि/ १०८४६/कक्ष-३, दि.२९.१२.२००४.

**<u>शासन निर्णय</u>** :- भंडारा जिल्हा कारागृह येथे कर्मचा-यांकरीता टाईप-१ ची ८ निवासस्थाने बांधण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात असे नमूद करण्यात येते की, भंडारा जिल्हा कारागृह येथे कर्मचा-यांकरीता टाईप-१ ची आठ निवासस्थाने बांधण्याचे काम केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजना (७५:२५) (योजनेतर) या पंचवार्षीक योजनेमध्ये समाविष्ट असून सन २००४-०५ च्या केंद्र शासनास पाठविलेल्या कामांच्या वार्षिक आराखडयात याचा समावेश केला आहे व त्यासाठीच्या खर्चासाठी विभागाने मागणी क्र.बी-५, मुख्य लेखाशिर्ष "२०५६-तुरुंग, १०१ तुरुंग, केंद्र पुरस्कृत योजना (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (२०५६ ०१८९) योजनेतर /दत्तमत" या लेखाशिर्षाखाली तरतूद केली आहे. त्या अनुषंगाने कारागृह महानिरीक्षणालयाने त्यांचे उक्त संदर्भाधीन पत्रान्वये भंडारा जिल्हा कारागृह येथे कर्मचा-यांकरीता टाईप-१ ची आठ निवासस्थाने बांधण्यासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भंडारा व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांनी स्वाक्षांकित केलेले रु.३६,००,०००/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केले आहेत.

२. सदर अंदाजपत्रकातील संगणकासाठी केलेली तरतूद वगळून व इमारतीचा नकाशा वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेण्याच्या अटीवर प्रस्तुत बांधकामासाठी होणा-या खर्चाच्या मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे.

३. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता तसेच कारागृह कर्मचा-याच्या सोयीसुविधेत होणारी वाढ, कामाची निकड व यासाठी केंद्र शासनाचा प्राप्त होणारा निधी विहित मुदतीत खर्च करणे या बाबी लक्षात घेता भंडारा जिल्हा कारागृह येथे कर्मचा-यांकरीता टाईप-१ ची आठ निवासस्थाने बांधण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने उपरोक्त परिच्छेद-२ मध्ये दिलेल्या सहमतीनुसार रु.३६,००,०००/- खर्चाच्या

अंदाजपत्रकातील संगणकासाठी केलेली तरतूद रु.५३,०१७/- वगळून येणारा खर्च रु.३५,४६,९८३/- (रुपये पस्तीस लाख सेहेचाळीस हजार नऊशे त्र्याऐंशी फक्त) इतक्या खर्चास व अंदाजपत्रकास शासन या शासन निर्णयाद्वारे सदर इमारतीचा मांडणी नकाशा वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेण्याच्या अटीवर प्रशासकीय मान्यता देत आहे. सदर बांधकामासाठी निधी वितरण करण्यापूर्वी इमारतीचा नकाशा संबंधीत वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करुन घेण्यात यावा.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.बी-५, मुख्य लेखाशिर्ष "२०५६-तुरुंग, १०१-तुरुंग, केंद्र पुरस्कृत योजना (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (२०५६-०१८९-९) योजनेतर/दत्तमत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाचे सहमतीने व वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/ २००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग पाचच्या परिशिष्ठामधील अनु.क्र.१ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( आ. ग. परदेशी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर.
अधिक्षक, भंडारा जिल्हा कारागृह, भंडारा,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा,
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, भंडारा,
अवर सचिव,बीयुडी-१,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
उप सचिव, इमारती-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती,पीआरएस-२,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२

****